मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथील मुळ याचिका क्र. ५६३/२०१५ आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, उस्मानाबाद विरुध्द महाराष्ट्र शासन यामध्ये मा. न्यायालयाने दि.२१/०२/२०१९ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार सदर संस्थेच्या शाळेस अनुदानासाठी पात्र घोषित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : न्यायाप्र-२०२१/प्र.क्र.१२७/एसएम-४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक :- १४ जानेवारी, २०२२

वाचा:- (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. माशाअ-१००३/(५१६/०३)/माशि-१, दिनांक १७ फेब्रुवारी,२००४.
(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.माशाअ-२००९/(५९९/०९)/माशि-१, दिनांक २० जुलै,२००९.
(३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.माशाअ-२००९/(५९९/०९)/माशि-१, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११.
(४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. संकीर्ण-२०१२/(१५०/१२)/माशि-१,दिनांक १६ जुलै,२०१३.
(५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.माशान्या-१५१४/(७०/२०१४)/ एसएम-४,दिनांक ३० एप्रिल, २०१४.
(६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.माशान्या-१५१४/(७०/२०१४)/एसएम-४, दिनांक ०७ एप्रिल, २०१६
(७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. माशामु-२०१६/प्र.क्र.१८/एसएम-४, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६
(८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. न्यायाप्र- २०१८/(१५४/२०१८)/एसएम-४, दिनांक ०६ फेब्रुवारी, २०१९
(९) मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथील रिट याचिका क्र.५६३/२०१५ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक २१.०२.२०१९ रोजी दिलेला निर्णय.

**प्रस्तावना:-**

आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, उस्मानाबाद संचालित श्रीपतराव भोसले हायस्कुल, उस्मानाबाद या शाळेतील ३७ अतिरिक्त तुकड्या व त्यावरील १८ डी.एड. शिक्षक पदे व ३८ पदवीधर शिक्षक पदे अशा एकूण ५६ पदांना संदर्भाधीन क्र. (५) येथील शासन निर्णय, दिनांक ३०.०४.२०१४अन्वये २०१२-१३ पासून २० टक्के टप्पा अनुदानास पात्र घोषित करण्यात आले आहे.

सदर आदेशाविरुध्द संस्थेने मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.५६३/२०१५ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिलेले निदेश विचारात घेऊन सदर ३७ तुकड्यांना टप्पानिहाय अनुदानास पात्र घोषित करण्याबाबत संदर्भाधीन क्र.(६) येथील शासन निर्णय, दिनांक ०७.०४.२०१६ अन्वये सुधारित आदेश देण्यात आले होते. दरम्यानच्या कालावधीत दिनांक १४.०६.२०१६ रोजी मंत्रिमंडळाच्या बैठकीतील निर्णयानुसार, दिनांक १४.०६.२०१६ पूर्वी अनुदानास पात्र घोषित केलेल्या प्राथमिक/ माध्यमिक शाळा/तुकड्यांना दिनांक ०१.०९.२०१६ पासून सरसकट २० टक्के अनुदान मंजूर करण्याचे आदेश संदर्भाधीन क्र. (७) येथील शासन निर्णय, दिनांक १९.०९.२०१६ अन्वये देण्यात आले आहेत. त्यानुसार सदर संस्थेच्या शाळेच्या ३७ तुकड्यांवरील ५६ शिक्षकांना दिनांक ०१.०९.२०१६ पासून २० टक्के अनुदान अनुज्ञेय होते.

२. सदर ३७ तुकड्यांवरील ५६ शिक्षकांना शासन मान्यतेपूर्वीच दिनांक ०१.०६.२०१२ ते दिनांक २८.०२.२०१५ या कालावधीचे वेतन अनुज्ञेय नसताना देखील अदा करण्यात आले आहे. संदर्भ क्र.(७) येथील शासन निर्णय, दिनांक १९.०९.२०१६ मधील परिच्छेद क्र. ४.२ मध्ये ज्या शाळांना क्षेत्रीय अधिकाऱ्यांच्या स्तरावर यापूर्वीच्या काळात नियमबाह्य वेतन अनुदान दिल्याचे लक्षात आल्यास, अशा शाळांना अनुदान देण्यात येऊ नये, असे स्पष्ट केले आहे. त्यामुळे सदर संस्थेच्या शाळेतील ३७ तुकड्यांवरील ५६ शिक्षकांना दिनांक ०१.०९.२०१६ पासून अनुदान मंजूर करण्यात आले नाही. याबाबत संबंधित संस्थेने मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र.५६३/२०१५ दाखल केली असून यामध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक २५.०४.२०१८ रोजी दिलेल्या आदेशानुसार, संदर्भाधीन क्र.(७) येथील शासन निर्णय, दिनांक १९.०९.२०१६ मधील अट क्र.४.२ शिथील करुन सदर संस्थेच्या शाळेच्या ३७ तुकड्यांवरील ५६ शिक्षकांना दिनांक ०१.०९.२०१६ ते दिनांक ३०.११.२०१८ या कालावधीची २० टक्केनुसार वेतन अनुदानाची थकबाकी तसेच दिनांक ०१.१२.२०१८ पासून २० टक्के अनुदान विहित अटी व शर्तीच्या अधीनतेने मंजूर करण्यास संदर्भाधीन क्र.(८) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

३. सदर संस्थेने मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.५६३/२०१५ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ येथील याचिका क्र. ५६३/२०१५ दाखल केली होती. सदर याचिकेमध्ये मा. न्यायालयाने दि.२१.०२.२०१९ रोजी खालील प्रमाणे अंतिम निर्णय दिलेला आहे.

(i) The Petition is allowed

(ii) As per the proposal made by the Education Officer in his letter dated 08.10.2013 the Government is to give the grant in aid to the school of petitioner in respect of additional division from the academic year 2003-04.

(iii) The grant in aid is to be given only in respect of teaching staff actually appointed after the following due procedure and not in respect of the vacant posts.

(iv) It is to be ascertained that no appointment was given to open category candidate as against the posts which was available to reserved category candidate and if that is done by the Institution, grants in respect of that post are not to be given.

(v) Amount already given is to be adjusted accordingly and for the remaining amount the management will be responsible to the staff.

(vi) The process of ascertaining that proper procedure was followed is to be completed within six months.

Civil application is disposed of

४. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे उपरोक्त आदेश विचारात घेऊन सदर संस्थेच्या शाळेच्या ३७ तुकड्यांवरील ५६ शिक्षकांना वेतन अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेले विवेचन विचारात घेता, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ५६३/२०१५ मध्ये मा. न्यायालयाने दिनांक २१.०२.२०१९ रोजी दिलेल्या निर्णयानुसार, आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, उस्मानाबाद संचालित श्रीपतराव भोसले हायस्कुल, उस्मानाबाद या शाळेतील ३७ तुकड्या व त्यावरील ५६ शिक्षक पदांना, सदर शाळेने, दि.३१.०५.२०२१ रोजी आरक्षण धोरणाची पूर्तता केल्याने, दि.०१.०६.२०२१ पासून १०० टक्के अनुदानासाठी खालील अटी व शर्तीच्या अधीन पात्र घोषित करण्यास शासन मान्यता देत आहे.

१) अनुदान वितरीत करण्यापूर्वी संबंधित शाळा सर्व निकष व अटींची पूर्तता करीत असल्याची खात्री करुन अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही संबंधित शिक्षण उपसंचालक यांनी करावी.
२) अनुदानास पात्र ठरलेल्या शाळेसंदर्भात काही तक्रारी प्राप्त झाल्या असल्यास त्याची शहानिशा करुन सदर शाळेस अनुदान वितरीत करावे.
३) मा. उच्च न्यायालयात दाखल असलेल्या रिट याचिका क्र.५६३/२०१५ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयाच्या अधीन राहून सदर अनुदान मंजूर करण्यात येत आहे. मा. उच्च न्यायालयाच्या दि.२१.०२.२०१९ रोजीच्या आदेशानुसार दि.०१.०६.२०२१ पूर्वीच्या वेतनाची संपूर्ण जबाबदारी संस्थेची राहील.
४) प्रस्तुत प्रकरणी कोणतीही थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.
५) मा. उच्च न्यायालयाने दि.२१.०२.२०१९ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर संस्थेच्या शाळेच्या शिक्षकांना दि.०१.०६.२०१२ ते दि.२८.०२.२०१५ या कालावधीत नियमानुसार अनुज्ञेय नसताना अदा केलेले वेतन, शासन निर्णय, दिनांक ३०.०८.२०१६ अन्वये दिलेल्या टप्पा अनुदानानुसार अनुज्ञेय केलेल्या टप्प्यानुसार समायोजित करण्यात यावे.

२. सदर खर्च “मागणी क्रमांक ई-२ लेखाशिर्ष-२२०२ सर्वसाधारण शिक्षण ०२, माध्यमिक शिक्षण, ११०, अशासकीय माध्यमिक शाळांना व कनिष्ठ महाविद्यालयांना सहाय्य (००)(११) नवीन अशासकीय माध्यमिक शाळा उघडणे (अनिवार्य) (२२०२ ३३६१) ३६-सहायक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात येईल. सदर शासन निर्णयानुसार प्रस्तुत शाळेतील ३७

तुकड्यांवरील ५६ शिक्षकांना दिनांक ०१.०६.२०२१ पासून १०० टक्के दराने वेतन अनुदान सुरु करण्याबाबत शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, उस्मानाबाद यांनी पुढील योग्य ती कार्यवाही करावी व त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०९३/२०२१/व्यय-५, दि.२८.१२.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०११४१४४८३५५६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2022.01.14 14:49:35 +05'30'

**( टि.वा. करपते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव ( वित्त विभाग ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव ( शालेय शिक्षण ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहाय्यक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई .
८) आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), म.रा. पुणे,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, १/२ मुंबई / नागपुर,
११) महालेखापाल (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र, १/२ मुंबई / नागपुर,
१२) महालेखापाल (स्थायिक निकाल लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपुर,
१३) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुबई.
१४) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर.
१५) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, उस्मानाबाद.
१६) अधिक्षक वेतन पथक (माध्यमिक), जिल्हा परिषद, उस्मानाबाद.
१७) निवड नस्ती, एसएम-४.